ठेव संलग्न विमा योजनेअंतर्गत
निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निवियो २०१६ /प्र.क्र.९७ /क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २३ नोव्हेंबर, २०१६.

वाचा:-

१) सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्र.भनिनि-२०१२/२५/प्र.क्र.१३३/१२/१३-अ, दि.१५ जानेवारी, २०१३ .
२) क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक.लेखावि/ठेसंयो/२०१४/का-३/ दि.८ नोव्हेंबर, २०१६.

प्रस्तावना :-

भविष्य निर्वाह निधी वर्गणीदारांच्या कुटुंबियांना विशेष सामाजिक सुरक्षा मिळावी आणि शासकीय कर्मचाऱ्यांना त्यांच्या भविष्य निर्वाह निधीमधील बचत वाढविण्यास उत्तेजन मिळावे या हेतूने ठेव संलग्न विमा योजना, महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम १९९८ मधील नियम क्र.३० अन्वये लागू करण्यात आलेली आहे. ठेव संलग्न विमा योजनेच्या सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय दि. १५ जानेवारी, २०१३ च्या अनुषंगाने अहमदनगर, औरंगाबाद, पुणे, जळगांव व कोल्हापूर येथील एनसीसी कार्यालयातील ५ मृत कर्मचाऱ्यांच्या वारसांना ठेव संलग्न विमा योजनेअंतर्गत मिळणाऱ्या एकूण रु. २,५०,०००/- इतक्या रकमेस मान्यता देण्याची बाब या नस्तीवर विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

भविष्य निर्वाह निधी वर्गणीदारांच्या कुटुंबियांना विशेष सामाजिक सुरक्षा मिळावी आणि शासकीय कर्मचाऱ्यांना त्यांच्या भविष्य निर्वाह निधीमधील बचत वाढविण्यास उत्तेजन मिळावे या हेतूने लागू केलेल्या ठेव संलग्न विमा योजनेखाली, महाराष्ट्र राज्यातील अहमदनगर, औरंगाबाद, पुणे, जळगांव व कोल्हापूर येथील एनसीसी कार्यालयांतील एकूण ५ मृत कर्मचाऱ्यांच्या वारसांना एकूण रु.२,५०,०००/- इतक्या रकमेच्या मंजुरीस व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मृत कर्मचाऱ्याचे नाव | मृत्यू दिनांक | अनुज्ञेय रक्कम |
|---|---|---|---|
| १ | कै. डी. एस.पवार, वरीष्ठ लिपिक, ५७, महा. बटा.एनसीसी, अहमदनगर | ०७/०९/२०१३ | रु.६०,०००/- |
| २ | कै. एस.व्ही. लांडगे, वरीष्ठ लिपिक, ५० महा. बटा. एनसीसी, औरंगाबाद | २५/०६/२०१३ | रु.६०,०००/- |
| ३ | कै. सुनिल मरप्पा जगाली, कनिष्ठ लिपिक १, महा.सिंग, कॉय एनसीसी, पुणे | ३०/०३/२०१५ | रु.१०,०००/- |
| ४ | कै.राजेंद्र प्रभाकर निमजे, मुख्यलिपिक, १८ महा.बटा.एनसीसी, जळगांव | १९/०१/२०१६ | रु.६०,०००/- |
| ५ | कै. नरेंद्र देसाई, उपसंचालक, कोल्हापूर विभाग, कोल्हापूर | १२/०१/२०१४ | रु.६०,०००/- |
| | **एकूण रक्कम** | | **रु.२,५०,०००/-** |

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण ६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम १०४, (००)(०१) ठेव संलग्न विमा योजना-शासकीय भविष्यनिर्वाह निधी (२२३५ ०४८१) ५०, इतर खर्च- या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.२४/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१ . वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

३.४ वैयक्तिक लाभार्थींचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे.

३.५. दि.२४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

३.६. परिपत्रकातील “अ” व “ब” ची पूर्तता होत आहे.

४. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २०/०४/२०१६ व दि. २४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी उपरोक्त तक्त्यातील अनु.क्र. १ ते ४ साठी संबंधित समादेशक अधिकारी व अनु. क्र. ५ साठी विभागीय उपसंचालक, कोल्हापूर विभाग, कोल्हापूर यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा )यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७ व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११२३१२४७१२४६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Charushila Devendra Chaudhary

Digitally signed by Charushila Devendra Chaudhary
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Charushila Devendra Chaudhary
Date: 2016.11.23 12:51:23 +05'30'

**(चारुशीला चौधरी)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव
२) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

५) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
७) विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, कोल्हापूर विभाग, कोल्हापूर(संचालनालयामार्फत)
८) समादेशक अधिकारी, राष्ट्रीय छात्रसेना, अहमदनगर, औरंगाबाद, पुणे,जळगांव
९) ( संचालनालयामार्फत )
१०) कोषागार अधिकारी, अहमदनगर,औरंगाबाद,पुणे,जळगांव,कोल्हापूर.
११) निवडनस्ती, क्रीयुसे-३